**नगरोत्थान महाभियान खंडाळा शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नगरो-२०२४/प्र.क्र.२०२/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक:- १४ मार्च, २०२४**

**संदर्भ:-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो-२०१६/प्र.क्र.३२८/नवि-३३, दिनांक ०४ ऑक्टोबर, २०१६.
३. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३, दिनांक १४ फेब्रुवारी,२०१७.
४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र: ग्रापाधो-२०२१/प्र.क्र.१२२/पापु-०७, दिनांक २९ जून,२०२२.
५. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: नगरो-२०२३/प्र.क्र.२१३/नवि-३३, दिनांक १२ एप्रिल, २०२३.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: नगरो २०२३/प्र.क्र.३८९/नवि-३३, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२४.
७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्रमांक जा.क्र.मु.अ.(पुणे)/तांशा-३/म.सु.न अभियान/खंडाळा पापुयो/२९२१/२०२३, दिनांक ०८ डिसेंबर, २०२३.
८. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांचे पत्र क्र.नपप्रसं/खंडाळा न.प./पा.पु./प्र.क्र./२०२४/का.७/७३०, दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२४.
९. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक ६ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. नगरोत्थान अभियानांतर्गत **खंडाळा नगरपंचायतचा पाणी पुरवठा प्रकल्प** नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत संदर्भाधीन क्र. ८ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीकडे सादर करण्यात आला होता. या प्रकल्पास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,

पुणे विभाग यांनी तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसीनुसार सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

०१. नगरोत्थान महाभियानांतर्गत सादर करण्यात आलेल्या **खंडाळा नगरपंचायतचा पाणी पुरवठा प्रकल्प** संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतूदीच्या व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग यांनी दिनांक ०८ डिसेंबर, २०२३ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे.

| Sr. No. | Name of Sub Work | Amount in Rs |
|---|---|---|
| 1 | Working Survey | 200000 |
| 2 | Approach channel Existing Length-200 m proposed Length-30 Total Length-230 m | 15141090 |
| 3 | Repairs of RCC Approach Bridge ( Lenth 50 M) | 567430 |
| 4 | Repairs of Approach Bund: (Width-3.00 m Length-30 M) | 63103 |
| 5 | Repairs Of Existing Jackwell Dia- 9 m | 1863940 |
| 6 | Raw water pumping machinery JW TO BPT Q-156100 LPH Head H-46 m 50 HP VT Pump (1+1) | 5705421 |
| 7 | Raw Water Rising Main From Jackwell To WTP DI K-9 , Dia- 250 mm L - 900 m | 6678726 |
| 8 | Repairs For Existing WTP CAP - 3.5 MLD | 9817170 |
| 9 | Pure Water Pumping Machinery From WTP TO MBR Q-140500 LPH Head H-140 m 120 HP VT Pump (1+1) | 10241531 |
| 10 | Pure Water Rising Main From WTP To MBR DI K-9 , Dia- 250 mm L - 12500 m | 79502981 |
| 11 | MBR At Khandala ( Total Cap- 2,50,000 LIT) | 6471789 |
| 12 | Pure Water Gravity Main From MBR TO ESR'S HDPE 6 kg Dia- 150 mm TO 250 mm Total L - 1548 m | 6762607 |
| 13 | RCC Sump & Overhead Pump House Cap-15000 liter | 1253190 |
| 14 | Pure Water Pumping Machinery From Sump To ESR@WARD -17 Q-12800 LPH Head H-95 m 10 HP Submersible Pumps (1+1) | 230854 |
| 15 | Pure Water Rising Main From Sump Near MBR To ESR At Ward No- 17 HDPE 8kg , Dia- 110 mm L -3700 m | 7710357 |
| 16 | Provision for repairs to existing RCC Elevated Storage Reservoirs At khandala (TOTAL CAP:- 2,75,000 Lit) | 1752963 |
| 17 | RCC Elevated Storage Reservoirs (Total Cap:-6,55,000 Lit) | 12143907 |
| 18 | Distribution System HDPE PE- 4 KG/CM^2 DIA 110 mm TO 250 mm Total Length -44.33 Km | 80509661 |
| 19 | Road Reinstating | 36121688 |
| 20 | Trial Run | 105480 |
| 21 | Miscellaneous Works | 919441 |
| 22 | Full Automation (SCADA ) of WTP, RW & Pure water pump and ESR | 15885309 |
| 23 | Solar Plant | 5687414 |
| | Total | 305336052 |
| | 18 % GST Charges | 54960489 |
| | 1 % TS Charges | 3053361 |

| Sr. No. | Name of Sub Work | Amount in Rs |
|---|---|---|
| | PMC Charges | 6504000 |
| | Road Crossing / Railway Crossing | 5828625 |
| | Labour Insurance | 396434 |
| | Gross Total | 376078961 |
| | Say Rs. | **37.61 Cr.** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | कार्यादेश दिनांका पासून १८ महिने |

०२. **खंडाळा नगरपंचायतचा पाणी पुरवठा प्रकल्प** वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील:-

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ९५ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या ०५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | खंडाळा नगरपंचायत | रु. ३७.६१ कोटी | रु. ३५.७३ कोटी | रु. १.८८ कोटी |

०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **खंडाळा नगरपंचायतच्या पाणी पुरवठा** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-

**अ) प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा** :-

१. सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन **खंडाळा नगरपंचायतमार्फत** करण्यात यावे.

२. सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

३. सदर प्रकल्पासाठी प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क (PMC Charges) प्रकल्प किंमतीमध्ये समाविष्ट आहे. प्रकल्पाच्या प्रथम हप्त्याचा निधी वितरित केल्यानंतर त्यामधून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे तांत्रिक मान्यता शुल्क अदा करावे व प्रकल्पाच्या प्रगतीनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क अदा करणे नगरपंचायतवर बंधनकारक राहील त्याबाबत आवश्यक ठराव नगरपंचायतने करावा.

४. या अभियानाच्या संदर्भाधीन क्रमांक ६ मधील शासन निर्णयातील कार्यपद्धतीचे पालन करावे.

**ब) सुधारणांची पूर्तता :-** नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खालीलप्रमाणे सुधारणा राबविणे आवश्यक राहिल.

१. विभागाने विकसित केलेल्या महायुलबी प्रणालीचा अंगीकार करुन अथवा सदर प्रणालीशी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सध्या वापरात असलेल्या संगणकीय प्रणालीचे एकात्मिकिकरण (Integration) करुन त्यांच्या कामकाजाचे पूर्ण

संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारण्याची १०० % अंमलबजावणी करणे इ. बाबी बंधनकारक राहतील.

२. उचित वापरकर्ता शुल्क लागू करुन किमान एकूण मागणीच्या ८० % वसुली करणे.

३. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.

४. खंडाळा नगरपंचायतने त्यांच्या कार्यक्षेत्रातील घन व ओल्या कचऱ्याचे व्यवस्थापन उचितरित्या करणे बंधनकारक राहील.

५. खंडाळा नगरपंचायतने कार्यक्षेत्रातील सर्व इमारतीसाठी पर्जन्य जल पुनर्भरण करावे.

क) <u>निधी वितरणाची कार्यपद्धती:-</u>

१. नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने विहित कार्यपध्दतीनुसार निविदा प्रक्रिया राबवून कार्यादेश निर्गमित करुन शासनाकडे प्रथम हप्त्याच्या निधी मागणीचा प्रस्ताव सादर केल्यानंतर सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

२. सदर खंडाळा पाणीपुरवठा प्रकल्पातील शासन हिश्याची रक्कम अनुदान स्वरुपात एकूण तीन हप्त्यात वितरीत करण्यात येईल, सदर रक्कम व खंडाळा नगरपंचायतच्या स्वहिश्याची रक्कम शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकामध्ये स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३. सदर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना खंडाळा नगरपंचायतने त्यांना राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या १४ व्या वित्त आयोग (मुलभूत व कार्यात्मक) अनुदानाशी तसेच प्राप्त होणाऱ्या १५ व्या वित्त आयोगाच्या अनुदानाशी सांगड (Convergence) घालणे आवश्यक राहील. यासाठी त्यांनी यामधून मिळणारा निधी चिन्हांकीत करुन ठेवणे त्यांच्यावर बंधनकारक राहील.

४. शासनाने वितरीत केलेल्या हप्त्याची रक्कम व त्या प्रमाणात खंडाळा नगरपंचायतच्या हिश्याची रक्कम अशा एकूण रकमेच्या ७५ % खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र खंडाळा नगरपंचायतने नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतर पुढील हप्त्याच्या निधी वितरीत करण्यात येईल.

५. खंडाळा नगरपंचायतने दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्याचा निधी मागणी प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने सदर प्रस्तावाची छाननी करुन उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव द्यावा.

६. सदर प्रकल्पासाठी राज्यशासनाने खंडाळा नगरपंचायतस राज्यशासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्यशासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात

खंडाळा नगरपंचायतने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे या योजनेत खंडाळा नगरपंचायतचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.

७. सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व तो अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी खंडाळा नगरपंचायत व संबंधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

ड) **<u>निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-</u>**

१. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर ७ दिवसाच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व ९१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा खंडाळा नगरपंचायत आहे. त्यामुळे या कालमर्यादेचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, खंडाळा नगरपंचायत यांची राहील.

२. अमृत २.० अभियानांतर्गत पाणीपुरवठा व मलनि:स्सारण प्रकल्पांसाठी संदर्भाधीन दिनांक १९ ऑक्टोबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदर्श निविदा पुस्तिका (Model DTP) प्रसिध्द केली असून त्यानुसार अथवा त्यात वेळोवेळी केल्या जाणाऱ्या सुधारणानुसार नगरोत्थान महाभियानांतर्गत देखील निविदा प्रक्रिया राबविणे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस बंधनकारक राहील व अन्य प्रकारच्या प्रकल्पांसाठी शासनाच्या व केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार निविदा प्रक्रिया राबविणे बंधनकारक राहील.

३. यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

४. **<u>खंडाळा पाणीपुरवठा प्रकल्प</u>** पूर्ण करताना राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करणे बंधनकारक राहील. या प्रकल्पातील रस्ते पाणीपुरवठा/मलनि:स्सारण अशा कामांसाठी पुन्हा खोदावे लागणार नाहीत अशा पध्दतीने या रस्त्यांच्या कामांचे नियोजन करण्यात यावे. तसेच, सदर प्रकल्पात नमूद कामे मागील ५ वर्षात इतर कुठल्याही योजनेमधून करण्यात आलेली नाहीत याची पुनश्च खातरजमा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व मुख्याधिकारी, खंडाळा नगरपंचायत यांची राहील.

५. सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कार्यमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

६. सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या वस्तूंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराच्या मार्गदर्शनाने करावी.

७. सदर प्रकल्पासाठी सुरुवातीला अनावश्यक स्वरुपात **कोणत्याही प्रकारच्या पाईप्सची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय अनियमितता** समजण्यात येईल व त्यासाठी **संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार** धरण्यात येईल.

८. सदर प्रकल्पाच्या निविदेमध्ये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दिनांक २९ जून, २०२२ रोजीच्या भावभिन्नता व विशेष मदतीबाबतच्या शासन निर्णयातील आवश्यक तरतूदींचा समावेश करण्यात यावा.

९. खंडाळा नगरपरिषदच्या पाणीपुरवठा प्रकल्पासाठी आवश्यक पाणी आरक्षण, आवश्यक जागा, प्रकल्प राबविण्यासाठी आवश्यक इतर तांत्रिक बाबींची पूर्तता व प्रकल्पासाठी स्वहिश्यापोटी आवश्यक तरतूद याची पुनःश्च खातरजमा करूनच प्रकल्पाचे कार्यादेश निर्गमित करण्याची संपूर्ण जबाबदारी मुख्याधिकारी, खंडाळा नगरपंचायत यांची राहील.

**इ) प्रकल्पाचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण :-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासनाने विहीत केलेल्या यंत्रणे पैकी एका यंत्रणेकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने करुन घेणे बंधनकारक राहील, तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील, तद्‌नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**फ) प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी :-**

१. "महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयकृत बँकांकडून" तसेच "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासनमान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.

२. वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात यावी, तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

**ग) <u>प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती:-</u>**

१. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर **प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत व नगरपंचायतमार्फत** करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.

२. सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

३. प्रकल्प शाश्वत होण्याच्या अनुषंगाने सदर प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये नमूद केलेप्रमाणे पाणी पुरवठा कराची आकारणी करणेबाबत सर्वसाधारण सभेची मान्यता घेऊन त्याअनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे नगरपंचायतवर बंधनकारक राहील.

**ह) इतर बंधनकारक अटी व शर्ती :-**

१. राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, **<u>मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधितनागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची</u>** राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

२. संदर्भाधीन क्र. १ ते ५ या शासन निर्णयातील तरतूदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१४१७५९२९३०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT
CHANDRAKANT
ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1
bee0fffaa62085c34db6bfd8c, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE
74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT
CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.03.14 19:32:30 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय, मुंबई.

८. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, पुणे.
१२. जिल्हाधिकारी, सातारा.
१३. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग.
१४. जिल्हा प्रशासन अधिकारी, सातारा.
१५. मुख्याधिकारी, खंडाळा नगरपंचायत, खंडाळा.
१६. निवड नस्ती, नवि-३३.